**कापूस, सोयाबीन, भात, तुर व हरभरा पिकांवरी किडरोगांच्या व्यवस्थापनासाठी किड रोग सर्वेक्षण व सल्ला प्रकल्प (क्रॉपसॅप) राज्यात राबविण्यासाठी वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुगधव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : किरोनि-१४१६/प्र.क्र.२०१/४अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख :- ०९ मार्च, २०१७

वाचा :-

१) संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांचे पत्र जा.क्र./वि.प्र-७/क्रॉपसॅप १६-१७/प्र.क्र-१/२७२/१६, दि. ३०.४.२०१६
२) वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं.२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२० एप्रिल, २०१६
३) शासन निर्णय क्रमांक किरोनी-१४१६/प्र.क्र.२०१/४अे, दि. १८ जुलै, २०१४
४) क्र.अर्थस-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३,दि. ८ फेब्रुवारी, २०१७
५) वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.८ फेब्रुवारी, २०१७.
६) संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांचे पत्र क्र.जा.क्र./वि.प्र.७/क्रॉपसॅप-१६-१७/ प्र.क्र.२/६७/ १७, दि.७.२.२०१७.

प्रस्तावना :-

कापुस, सोयाबीन, भात, तुर व हरभरा पिकांवरील किड रोगांच्या व्यवस्थापनासाठी पीक कीड रोग सर्वेक्षण व सल्ला प्रकल्प (क्रॉपसॅप) सन २००९-१० पासून राष्ट्रीय कृषी विकास योजनेमधून राबविण्यात येत होता. सदर प्रकल्प सन २०१३-१४ पासून राज्य शासनाने राबविण्याचे निश्चित केले आहे. सदर प्रकल्प सन २०१६-१७ या वर्षात राबविण्यासाठी रु.११०० लक्ष एवढी तरतुद करण्यात आली आहे. त्यापैंकी रु.२७५.८२ लक्ष एवढी तरतूद वित्त विभागाच्या मान्यतेनुसार सन २०१५-१६ या वर्षातील प्रलंबित देयके अदा करण्यास उपलब्ध आहे.

सदर निधीपैंकी रु.४८० कोटी एवढा निधीच्या कार्यक्रमास संदर्भाधीन अ.क्र.३ येथील दि. १८ जुलै, २०१६ च्या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यासाठी आणखी रु. ५८१.१२ लक्ष एवढया निधीची आवश्यकता आहे. सदर निधीच्या कार्यक्रमात वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

१) “पिकावरील कीडरोग सर्वेक्षण व सल्ला प्रकल्प (क्रॉपसॅप)” राबविण्यासाठी रु.५८१.१२ लक्ष (रु.पाच कोटी एक्याऐंशी लक्ष बारा हजार फक्त) रक्कमेच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२) सदर निधीपैंकी रु.२७५.८२ लक्ष (रु.दोन कोटी पंच्याहत्तर लक्ष ब्याऐंशी हजार फक्त) एवढा निधी सन २०१५-१६ या वर्षातील प्रक्ल्पावरील खर्चाची प्रलंबित देयके अदा करण्यासाठी वापरण्यात यावा.

३) उर्वरित रु.३०५.३० लक्ष (रु.तीन कोटी पाच लाख तीस हजार फक्त) सन २०१६-१७ या वर्षात प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी खर्च करण्यात यावा.

४) सदर निधी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०१६-२०१७ च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

लेखाशीर्ष :-
मागणी क्र.डी-३,
२४०१,पीक संवर्धन,
१०२ - अन्नधान्य पिके,
(००) (३०) पिकावरील किडरोग सर्वेक्षण व सल्ला प्रकल्प
(२४०१९२४२) राज्य योजना
३३ - अर्थसहाय्य

५) सदर प्रकल्पाअंतर्गत मंजूर केलेला निधी खर्च करण्यास कृषी आयुक्तालयीन स्तरावर सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषी आयुक्ताल, महाराष्ट्र राज्य पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असुन, सदर निधीचे क्षेत्रिय स्तरावर संबंधिताना वितरण करणे, यासाठी संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्याचप्रमाणे सदर प्रयोजनार्थ विभागीय कृषी सह संचालक स्तरावर, विभागीय कृषी सह संचालक कार्यालयातील लेखाधिकारी, जिल्हा स्तरावर, जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी, उपविभाग स्तरावर उपविभागीय कृषी अधिकारी व तालुकास्तरावर तालुका कृषी अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६) क्षेत्रिय स्तरावर योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी योजनेच्या सविस्तर मार्गदर्शक सूचना संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी निर्गमित कराव्यात.मार्गदर्शक सूचना निर्गमित करताना पुढील बाबींचा प्रामुख्याने समावेश करण्यात यावा :-

**अ)** सदर प्रकल्पाअंतर्गत कंत्राटी कर्मचाऱ्यांचे वेतन, किमान वेतन कायदा, १९४८ अंतगर्त दि.०८ ऑगस्ट, २०१४ च्या आधिसुचनेनुसार अदा करावे.

**ब)** नोंदणीकृत मनुष्यबळ सेवा पुरवठा करणाऱ्या संस्थेमार्फत नियुक्त करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यासोबत पत्रव्यवहार करताना,क्षेत्रिय अधिकाऱ्यानी थेट कर्मचाऱ्यांशी पत्रव्यवहार न करता संस्थेमार्फत करावा.

**क)** कामाचा अनुभव किंवा उल्लेखनिय काम केल्याबाबतचे प्रशस्तीपत्रक थेट कर्मचाऱ्यांना देण्यात येवू नये.

७) सदरहू प्रकल्प, विभागातील सर्व स्तरातील उपलबध कृषी अधिकारी व कृषी सहाय्यक यांच्याकडून राबविण्यात यावा. सदरहू कार्यक्रम आपला आहे, अशी जाणीव कृषी

आयुक्तालयातील तसेच विभागातील अधिकारी व कर्मचारी यांनी ठेवून प्रकल्पाची अंमलबजावणी करावी.

८) बाहेरुन नियुक्त करावयाचे मनुष्यबळ नोंदणीकृत संस्थांकडून उपलब्ध करुन घ्यावे. त्या अनुषंगाने, संस्थेशी प्रचलीत शासन कार्यपद्धती व नियमानूसार विहित अटी व शर्तीसह करार करावा. कराराच्या अटी व शर्ती विहीत करण्यास संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्याचप्रमाणे सदर आर्थिक वर्षामध्ये प्रत्यक्ष पीक परिस्थितीनुसार प्रकल्पांतर्गत समाविष्ट पिकांच्या पेरणी क्षेत्रात वाढ/घट झाल्यास, प्रत्यक्ष पेरणी क्षेत्रानुसार किड सर्वेक्षक, संगणक प्रचालक, कृषी पर्यवेक्षकाच्या नियुक्तीस व अनुषंगीक खर्चास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

९) सदर प्रकल्प, योजनेसंबंधीच्या शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार राबविण्यात यावा. या योजनेकरिता उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे, यांच्या स्वाक्षरीने शासनास सादर करावे.

१०) सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक. २०.०४.२०१६ च्या परिशिष्टातील तपासणी सूचीतील अटींच्या पूर्ततेच्या अधीन राहून व वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. ८.२.२०१७ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकाऱ्याचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०९१६३८१०२२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Siddharth H Chaware

Digitally signed by Siddharth H Chaware
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Departmemt, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b4967ce0b5887c76156645efd775bffa84d471ca667907fda2cdbd1c76d7831f, cn=Siddharth H Chaware
Date: 2017.03.09 16:38:11 +05'30'

**( सिद्धार्थ चवरे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (कृषी), महाराष्ट्र राज्य, पुणे (५प्रती)
२. कुलगुरु, डॉ.पंजाबराव देशमुख कृषी विद्यापीठ, अकोला
३. कुलगुरु, मराठवाडा कृषी विद्यापीठ, परभणी
४. कुलगुरु, महात्मा फुले कृषी विद्यापीठ,राहूरी अहमदनगर
५. कुलगुरु, डॉ.बाळासाहेब सांवत कोकण कृषी विद्यापीठ, दापोली
६. सर्व सन्माननीय विधीमंडळ सदस्य
७. महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½, मुंबई/ नागपुर
८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई

९. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे
१०.संचालक, राष्ट्रीय एकात्मिक कींड व्यवस्थापन केंद्र (भारतीय कृषी संशोधन परिषद), नवी दिल्ली
११.संचालक, केंद्रीय एकात्मिक कींड व्यवस्थापन केंद्र, नागपूर
१२.संचालक, सोयाबीन संशोधन संचालनालय, इंदोर
१३.संचालक, केंद्रीय कापूस संशोधन केंद्र, नागपुर
१४.संचालक, राष्ट्रीय कोरडवाहू शेती संशोधन संस्था (CRIDA) , हैद्राबाद
१५.सर्व संचालक/सहसंचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र  राज्य पुणे
१६.विभागीय आयुक्त (सर्व)
१७.विभागीय कृषी सहसंचालक (सर्व)
१८. जिल्हाधिकारी (मुंबई व मुंबई उपनगर हे जिल्हे वगळून सर्व)
१९.जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
२०.जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी (सर्व)
२१.वित्त विभाग (व्यय-१/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई-३२
२२.सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/ कार्यासन आधिकारी, कृषी विभाग (कृषी)
२३.मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
२४.मा.मंत्री यांचे खाजगी सचिव
२५.निवड नस्ती (कार्यसन ४अे).